**खेकडा व जिताडा या बहुप्रजातीय मत्स्यबीज उत्पादन केंद्राची उभारणी करण्यास प्रशासकीय मान्यता ....**
**सन २०१७-१८ साठी राष्ट्रीय कृषी विकास योजना (RKVY) अंतर्गत अर्थसहाय्य**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि-२०१७/प्र.क्र. ९० /पदुम-१३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २८ जून, २०१७

वाचा-

१) आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र. मत्स्य/भू/०२०९०१/०८/२०१७, दि. २०१.०१/२०१७
२) कृषि व पदुम विभागाचे क्र. आरकेव्ही-०३१७/सी.आर.१४/आरकेव्हीवाय सेल, दि.०९.०६.२०१७ अन्वये निर्गमित केलेले राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त

प्रस्तावना-

राज्याला ७२० कि.मी. चा सागरी किनारा लाभलेला असून सदर सागरी किनाऱ्यावर ७० खाडया आहेत. राज्यातील सध्याचे सागरी मत्स्योत्पादन सुमारे ४.५ लक्ष मेट्रीक टन इतके आहे. राज्यात उत्पादीत होणारे सागरी मत्स्योत्पादन हे बहुप्रजातीय स्वरुपाचे आहे. या बहुप्रजातींमधील सागरी किनारा व तेथील पर्यावरणासाठी पूरक ठरणाऱ्या विशिष्ट व अनुकूल जातींच्या माश्यांचे जसे की, जिताडा व खेकडा, कालव, कोळंबी या प्रजातींचे संवर्धन होणे आवश्यक आहे. या संवर्धनामुळे कांदळवनाचे नैसर्गिकरित्या सहव्यवस्थापन व संरक्षण होण्यासही मदत होणार आहे.

सद्यस्थितीत राज्याची जिताडा/खेकडा बीजाची गरज सेंट्रल इन्स्टिटयुट ऑफ ब्रॅकीशवॉटर ॲक्वाकल्चर ( CIBA), भारतीय कृषि संशोधन परिषद (ICAR), राजीव गांधी सेंटर फॉर ॲक्वाकल्चर (RGCA), सागरी उत्पाद निर्यात विकास प्राधीकरण (MPEDA) यांच्यामार्फत भागविली जात आहे. मात्र सदर गरज भागविणे पुरेसे होत नसल्याने राज्यात बहुविध प्रजाती बीज उत्पादन केंद्र स्थापण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे.

उक्त वस्तुस्थिती लक्षात घेऊन संदर्भाधीन १ येथील पत्रान्वये आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी वेंगुर्ला तालुक्यातील उभादांडा ग्रामपंचायत हद्दीतील वाघेश्वर महसुली गावातील भूमापन क्र.-४७/० येथील १.२५ हेक्टर जागेवर खेकडा व जिताडा या बहुप्रजातीय मत्स्यबीज उत्पादन केंद्राची स्थापना करण्यासाठीचा रु. १५.८० कोटी इतक्या रकमेचा सविस्तर प्रकल्प अहवाल १००% राष्ट्रीय कृषी विकास योजना (RKVY) अंतर्गत अनुदान प्राप्तीकरीता शासनास सादर केला होता. राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीसमोर सदर प्रकल्प पीपीपी ने राबविण्यास सादर करण्यात आला असता, संदर्भाधीन क्र. २ येथील पत्रान्वये निर्गमीत करण्यात आलेल्या इतिवृत्तान्वये त्यास मान्यता देण्यात आलेली आहे. खेकडा व जिताडा या बहुप्रजातीय मत्स्यबीज उत्पादन केंद्राची स्थापना सार्वजनिक-खाजगी भागिदारीतुन करण्यासाठीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

शासन या निर्णयान्वये केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषी विकास योजना (RKVY) अंतर्गत प्राप्त होणा-या अर्थ सहाय्यातून, वेंगुर्ला तालुक्यातील उभादांडा ग्रामपंचायत हद्दीतील वाघेश्वर महसुली गावातील भूमापन क्र.-

४७/० येथील १.२५ हेक्टर जागेवर खेकडा व जिताडा या बहुप्रजातीय मत्स्यबीज उत्पादन केंद्राची स्थापना सार्वजनिक-खाजगी भागिदारीतुन करण्याच्या प्रकल्प प्रस्तावास खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देत आहे.

१) सार्वजनिक-खाजगी भागिदारीतुन प्रकल्प बांधकाम राबविण्यासाठी BOO / BOOT तत्त्वावर स्पर्धात्मक निविदा मागविण्यात याव्यात.
२) निविदा मसुदा हा मत्स्यव्यवसाय विभागाने निदेशक, सागरी उत्पाद निर्यात विकास प्राधिकरण (MPEDA) कोची, केरळ या संस्थेच्या अधिपत्याखालील कार्यरत राजीव गांधी जलकृषि केंद्र (RGCA) तामिळनाडू यांचे तांत्रिक मार्गदर्शनाखाली तयार करावा व त्यास शासनाची मान्यता घ्यावी.
३) सदर प्रकरणी राज्य शासनाकडून निधीची तरतूद करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. मात्र सदरची रक्कम ही फक्त VGF साठी लागणाऱ्या रकमेच्या मर्यादेपर्यंत देय राहील. करिता VGF रकमेची तरतूद करण्यासाठीचा स्वयंस्पष्ट व परिपूर्ण कारणमिमांसेसह प्रस्ताव आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांनी शासनास सादर करावा.
४) आयुक्त मत्स्यव्यवसाय ,महाराष्ट्र राज्य, मुंबई हे उपरोक्त प्रकल्पाचे संनियंत्रण अधिकारी राहतील. प्रकल्प विहित कालावधीत पूर्ण करण्याची व उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याची जबाबदारी ही आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०६२८१५५९०४५५०१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shri Ravindra Gurav

Digitally signed by Shri Ravindra Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, cn=Shri Ravindra Gurav
Date: 2017.06.28 15:57:51 +05'30'

**(र. व. गुरव)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**
१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
३) मा. राज्यमंत्री(पदुम) यांचे खाजगी सचिव
४) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा व विधानपरिषद.
५) मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६) आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७) प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई
८) सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, सिंधुदुर्ग
९) महालेखापाल १ /२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) मुंबई / नागपूर
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग
११) उप कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग
१२) सहसंचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर,मुंबई
१३) अवर सचिव/ कक्ष अधिकारी (राकृवियो कक्ष,पदुम १२, पदुम १४, पदुम १६) / निवडनस्ती.